**उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथील खंडपीठ इमारतीच्या फायर ऑडिट अहवालानुसार करावयाच्या नागरी व अभियांत्रिकी कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

### शासन निर्णय क्रमांकः एचसीटी ५२१५/१२११/प्र.क्र.१४२/का.४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २२ ऑगस्ट, २०१७

**वाचा -**

१) उप प्रबंधक B (W) शाखा, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B (W) ६०५४ of २०१६, दि. २६/०८/२०१५.

२) स्टेशन ऑफिसर, लकडगंज फायर अँड इमर्जन्सी सर्विसेस, नागपूर महानगर पालिका, नागपूर यांचे पत्र क्र. NMC/F&ES/LKD/R.C. No ८६, दि. १५/०९/२०१४.

३) संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. मअसे/२०१७/३७/१०५, दि. १८/०१/२०१७.

**प्रस्तावना -**

उच्च न्यायालय मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र. २१६/२०१० मध्ये मा. उच्च न्यायालयाच्या आदेशास अनुसरून राज्यातील सर्व न्यायालयीन इमारतींचे फायर ऑडिट करण्यात येत असून अग्नीशमन यंत्रणा उभारणी व अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यात येत आहे. यानुषंगाने मुंबई उच्च न्यायालयातील आपत्ती व्यवस्थापन समितीने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार नागपूर खंडपीठ इमारतीचा फायर ऑडिट अहवाल स्टेशन ऑफिसर, लकडगंज फायर अँड इमर्जन्सी सर्विसेस, नागपूर महानगर पालिका, नागपूर यांनी सादर करून अग्नीशमन यंत्रणा उभारणी व अग्नीप्रतिबंधक उपाययोजना सुचविल्या आहेत. त्यानुसार खंडपीठ इमारतीमध्ये अग्नीप्रतिबंधक यंत्रणा व उपाययोजना करण्यास संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन संचालनालय यांनी संदर्भाधीन दि. १८/०१/२०१७ रोजीच्या पत्रान्वये सहमती दर्शविली आहे. सदर फायर ऑडिट अहवालानुसार करावयाच्या नागरी व अभियांत्रिकी कामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग १, नागपूर यांनी तयार केले आहे. त्यानुसार सादर करण्यात आलेला उच्च न्यायालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

उच्च न्यायालय, मुंबई च्या नागपूर येथील खंडपीठ इमारतीमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी व अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने स्टेशन ऑफिसर, लकडगंज फायर अँड इमर्जन्सी सर्विसेस, नागपूर महानगर पालिका, नागपूर यांनी सादर केलेल्या फायर ऑडिट अहवालानुसार करावयाच्या नागरी व विद्युत अभियांत्रिकी उपाययोजनांना तसेच सदर कामाच्या अंदाजपत्रकीय रकमेमध्ये ४ % आकस्मिक खर्च समाविष्ट करून एकूण रु. ६९,५३,३०३/- ( रुपये अक्षरी एकोणसत्तर लक्ष त्रेपन्न हजार तीनशे तीन फक्त ) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी स्थानिक अग्नीशमन अधिकारी यांनी विहित केलेल्या उपाययोजनांमधीलच कामे असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी खंडपीठ प्रशासनाच्या संबंधित अधिकारी यांची राहील. प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करून ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

प्रस्तुत आदेश हे सार्वजनिक बांधकाम विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. १८६/इमा २, दि. ६/०३/२०१६ व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. ७६१/व्यय ५, दि. २०/०७/२०१७ अन्वये तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२२१६४३०८५५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev Rajaram Keluskar

Digitally signed by Sanjeev Rajaram Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Low And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev Rajaram Keluskar
Date: 2017.08.22 16:33:49 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई/नागपूर.
२. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
३. प्रबंधक (निरीक्षणे २), उच्च न्यायालय मुंबई.
४. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
५. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
६. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर.
७. महालेखापाल २ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय ५, मंत्रालय, मुंबई.
१०.विधि व न्याय विभाग, कार्यासन २३/२५, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती.